**जिल्हा परिषद शिक्षकांना नगरपालिका, नगरपरिषदा किंवा महानगरपालिकांमध्ये वर्ग करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिपब-४८१७/प्र.क्र.२८०/आस्था-९**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४००००१.
दिनांक :- २९ जून, २०१७

# शासन निर्णय

प्रस्तावना :--

महाराष्ट्र जिल्हा परिषदा, जिल्हा सेवा (सेवाप्रवेश )नियम,१९६७ मधील नियम ६(९) मध्ये खालील प्रमाणे तरतुद करण्यात आली आहे. “ राज्य शासनाच्या किंवा त्यावेळी अंमलात असलेल्या कायद्यानुसार प्रस्थापित झालेल्या कोणत्याही महानगरपालिका किंवा नगरपरिषदेच्या, विवाहित स्त्री कर्मचा-याने, विनंती अर्ज केल्यावर मुख्य कार्यकारी अधिकारी, अशा कर्मचा-यांची राज्य शासन, महानगरपालिका किंवा यथास्थिती नगरपरिषदा आणि जिल्हा परिषद यांच्यामध्ये परस्पर संमत होतील अशा अटी व शर्तीवर जिल्हा परिषद सेवेतील सरळ सेवेच्या पदावर संबंधीत स्त्री कर्मचारी जिल्हा परिषद पदावर, त्या पदाच्या सेवा प्रवेश नियमात नमुद अटी व शर्तीसह पात्रता धारण करीत असल्यास अशा महिला कर्मचा-यांची नियुक्ती करू शकेल ” .

२. मात्र जिल्हा परिषदेच्या शिक्षकांना नगरपालिका, नगरपरिषदा किंवा महानगरपालिका मध्ये जाण्यास वाव नव्हता, अशा सेवा वर्ग करण्यासाठी जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत शिक्षकांचे अर्ज ग्राम विकास विभागाकडे प्राप्त होत होते. अशा प्रकारे नगरपालिका,नगरपरिषदा किंवा महानगरपालिका येथे बदलीने जाण्यास इच्छुक असलेल्या शिक्षकांनी विभागाकडे त्यांच्या सेवा जिल्हा परिषदेमधुन नगरपालिका, नगरपरिषदा किंवा महानगरपालिका मध्ये वर्ग करण्याची मागणी केली होती. त्यानुषंगाने जिल्हा परिषदेमधील शिक्षकांच्या सेवा वर्ग करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :--**

वरील बाबींचा विचार करुन शासनाने जिल्हा परिषदेमधील कार्यरत शिक्षकांच्या सेवा नगरपालिका, नगरपरिषदा व महानगरपालिकामध्ये वर्ग करण्याच्या धोरणाबाबत नव्याने विचार करण्याचा निर्णय घेतला आहे.

२. राज्य शासनाच्या किंवा त्यावेळी अंमलात असलेल्या कायद्यानुसार प्रस्थापित झालेल्या कोणत्याही महानगरपालिका, नगरपालिका किंवा नगरपरिषदेच्या नियमित /स्थायी आस्थापनेवर सेवा वर्ग करण्यासाठी जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत असणा-या नियमित/स्थायी शिक्षकाने विहित मार्गाने विनंती अर्ज केल्यावर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अशा कर्मचा-यांना नगरपालिका, नगरपरिषदा किंवा महानगरपालिका यांच्यामध्ये परस्पर सहमत होतील, अशा अटी व शर्तीवर कार्यमुक्त करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२९१५१७११७५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.06.29 18:15:44 +05'30'

( असीम गुप्ता )
शासनाचे सचिव

प्रति,

१) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव,मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री ग्रामविकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय , मुंबई
६) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई

७) सर्व अपरमुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग

८) सर्व विभागीय आयुक्त

९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

१०) उपायुक्त (आस्थापना) विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व विभाग)

११) माहिती व जनसंपर्क संचालनालय यांना प्रसिध्दीसाठी अग्रेषित.

१२) सर्व कार्यासने, ग्रामविकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

१३) निवड नस्ती कार्या क्र.आस्था-९, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२